# हेरॉल्ड, खडू आणि प्राणी

रुपांतर: लिझा बेकर

चित्रे: अँडी चिआंग, जोस लोपेझ, केविन मुरावस्की



मराठी अनुवाद: सुशील मेन्सन





हेरॉल्ड रात्री झोपू शकला नाही. म्हणून त्याने आपले कापसाने भरलेले प्राणी बाहेर काढले.





प्राण्यांची किती मजा असते!
त्याच्या मनात आलं.

कोणता प्राणी बनू मी?
तो विचार करू लागला.





हेरॉल्डला प्राण्यांची जास्त
माहिती हवी होती.

आपला जांभळा खडू उचलून
तो एका साहसी मोहिमेवर
निघाला.



आपण खूप मोठ्ठा आणि अंगापिंडाने बळकट प्राणी व्हावं, असं त्याच्या मनात आलं. त्याने खडूने एक हत्तीचं चित्र काढलं.

हत्तीने आपली सोंड पाण्याच्या बादलीत बुडवली. मग त्याने सोंडेतलं पाणी सभोवताली फवारलं.



हेरॉल्डला मजा येऊ लागली. मग त्याने पाण्याच्या रबरी पाईपचं चित्र काढलं. पण त्याला पाईपवर नियंत्रण ठेवता आलं नाही. त्यातलं पाणी चुकून हत्तीवरच उडालं.

हत्ती पूर्णपणे भिजून गेला. हेरॉल्डने त्याची माफी मागितली. पण हत्ती तिथून निघून गेला.



आपण खूप लांबचा प्रवास करू,
हेरॉल्डच्या मनात आलं.
म्हणून त्याने उंटाचं चित्र काढलं.

मग हेरॉल्डने पाठीवरच्या बॅगचं चित्र काढलं.
ती बॅग खाद्यपदार्थ आणि पाण्याने भरली होती.
मग हेरॉल्ड आणि उंट वाळवंटात चालू लागले.



हेरॉल्ड पायी पायी चालत होता.
त्यामुळे त्याला बॅगचं ओझं जाणवू लागलं.
तो खूप थकून गेला.

सूर्य आग ओकत होता.
होरॉल्डने एका तळ्याचं आणि
ताडाच्या झाडाचं चित्र काढलं.





हेरॉल्ड आराम करत होता, तेव्हा चित्त्यांचा एक कळप जवळून दौडत गेला. मला त्यांच्यासोबत धावायला पाहिजे, हेरॉल्डच्या मनात आलं.

हेरॉल्डने रोलर स्केटच्या जोडीचं चित्र काढलं. आणि तो चित्त्यांच्या मागे धावू लागला.



त्याला चित्त्यांच्या मागे पळायला मजा वाटू लागली. पण थोड्याच वेळात त्याला खूप गरम होऊ लागलं. त्याला एखाद्या थंडगार जागी जावंसं वाटू लागलं.

हेरॉल्डने खडू उचलून आभाळात एक रेषा ओढली. आता तो एका बर्फाळ डोंगराच्या माथ्यावर उभा होता.



तिथे हेरॉल्डला पेंग्विनचा कळप दिसला.
ते आपल्या पोटावर झोपून एक-एक करत
उतारावरून घसरत खाली जात होते.

बर्फाच्या डोंगरावरून घसरायला मलासुद्धा
आवडेल, हेरॉल्डच्या मनात आलं.
मग त्याने बर्फात घसरत चालणाऱ्या
स्लेजचं चित्र काढलं.



बरेच पेंग्विन हेरॉल्डच्या स्लेजवर चढून बसले. स्लेज पेग्विनने भरून गेली. स्लेज डोंगरावरून वेगाने खाली घसरू लागली.

मग अचानक एक दुर्घटना घडली. हेरॉल्ड आणि पेंग्विन वर उडून बर्फात पडले.



हेरॉल्डच्या अंगावर बर्फ साचला.
तो अगदी गारठून गेला. मग त्याने
आभाळात सूर्याचं चित्र काढलं.

हेरॉल्डला पुन्हा उबदार वाटू लागलं. त्याने
एक जंगल काढलं.





जंगलात माकडं झाडांच्या वेलींवर झुलत होती. मलाही झाडावर झोके घ्यावसं वाटतंय, हेरॉल्ड मनाशी म्हणाला.

हेरॉल्ड झाडावर चढला आणि त्याने एक वेल हातात पकडली.
मग तो माकडांसारखं पुढेमागे झोके घेऊ लागला.





हेरॉल्डला प्राण्यांसारखं आयुष्य जगायला मजा आली.
पण आपलं स्वत:चं आयुष्य जास्त छान आहे, असं त्याला वाटू लागलं.

त्याने आपला जांभळा खडू उचलला आणि आपल्या घराच्या खिडकीचं चित्र काढलं.



घरात येऊन हेरॉल्ड पलंगावरच्या चादरीत शिरला. त्याने आपल्या लाडक्या कुत्र्याला बाहुंमध्ये घेतलं. त्याचा जांभळा खडू जमिनीवर पडला आणि तो गाढ झोपी गेला.

हेरॉल्ड आपल्या आईला तिच्या वाढदिवशी काय भेटवस्तू देईल?



**समाप्त**